आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात सर्वसाधारण शिक्षण या मुख्य शिर्षांतर्गत निधी वितरण (लेखाशीर्ष २२०२ १९०१, २२०२ १९४८ व २२०२ एच ९७३-वेतन)

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२३/प्र.क्र.०४/का-६.**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक :१८ मे, २०२३.

**वाचा :-**

१. वित्त विभाग शासन,परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अ्रथ-३. दि.१२.०४.२०२३.

२. शालेय शिक्षण व क्रीडा विभागाची नस्ती क्र.अनुवि-४९२३/ प्र.क्र.५१/ अर्थसंकल्प.

**प्रस्तावना :-**

"महाराष्ट्र विनियोजन विधेयक, २०२३" यास विधानमंडळाने मंजुरी दिलेली असुन महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी त्यास अधिसंमती दिलेली आहे. त्यानुषंगाने वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२३ च्या शासन निर्णयातील तरतुदी नुसार अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण (BEAMS) वितरण प्रणालीवर ३६- सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाकरीता उर्वरीत निधी वितरणासाठी उपलब्ध करुन दिलेला आहे. यास्तव, शालेय शिक्षण विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या योजनांतर्गत ३६- सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टांकरीता एप्रिल ते जुन २०२३ या पहिल्या तिमाहीसाठी २० टक्के निधी शालेय शिक्षण विभागास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमातंर्गत सन २०२३-२४ अंतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२०२- सर्वसाधारण शिक्षण या मुख्य लेखाशिर्षांतर्गत वित्त विभागाने वितरणाकरीता उपलब्ध करून दिल्याप्रमाणे वेतनासाठी वार्षिक अर्थसंकल्पीत तरतुदींच्या २० टक्के मर्यादेतील उर्वरीत एकूण **रू.१०४२.२९५ लाख (रुपये दहा कोटी बेचाळीस लाख एकोणतीस हजार पाचशे फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई यांना वितरीत करण्यास खालीलप्रमाणे शासन मान्यता देण्यात येत आहे :-

(रु. लाखात)

| अ. क्र. | योजनेचे नाव | उद्दिष्ट | अर्थसंकल्पित तरतूद सन २०२३-२४ | यापुर्वी वितरीत करण्यात आलेला निधी | सदर शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात येत असलेली उर्वरीत १० % तरतूद |
|---|---|---|---|---|---|

| १ | २ | | ३ | | ४ |
|---|---|---|---|---|---|
| १ | सर्वसाधारण माध्यमिक शाळांना सहायक अनुदान (लेखाशिर्ष २२०२१९०१) | ३६ सहाय्यक अनुदाने (वेतन) | ७५००.०० | ७५०.०० (१० %) | ७५०.०० (१०%) |
| २ | अशासकीय कनिष्ठ महाविद्यालयांना सहायक अनुदान (लेखाशिर्ष २२०२ १९४८) | | ४२२.९५ | ४२.२९५ (१० %) | ४२.२९५ (१०%) |
| ३ | सैनिक शाळेमधील आदिवासी विद्यार्थ्यांच्या तुकडीला सहाय्य (लेखाशिर्ष २२०२ एच ९७३) | | २५००.०० | २५०.०० (१० %) | २५०.०० (१०%) |
| **एकुण** | | | **१०४२२.९५** | **१०४२.२९५** | **१०४२.२९५** |

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. सदर वितरीत निधी खर्च करतांना संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिकेमधील तरतुदी व सर्व अटींचे पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागामार्फत अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या निधी मर्यादेत व प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५१५१६४१३९३०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2023.05.18 16:06:14 +05'30'

(राजेंद्र दे. भवारी)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अप्पर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

५. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/ नागपूर/ अमरावती.
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. वित्त विभाग ( अर्थोपाय /अर्थ-१९ / व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२
१०. निवडनस्ती, कार्यासन- ०६, आदिवासी विकास विभाग.